**गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर या आश्रमशाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. अआशा. २०१६/प्र.क्र.२०६/का.११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २१ जून, २०२३

वाचा :

१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. अआशा-१०९८/प्र.क्र.१/का-११, दि.१३ नोव्हेंबर, १९९८.
२) आयुक्त, आदिवासी विकास , नाशिक यांचे आदेश क्र.अनुआशा- २०११ /प्र. क्र. १९/का.७(३) /२९८६, दिनांक २२.०४.२०१६
३) अध्यक्ष, गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड यांचे दिनांक १६.०५.२०१६ रोजीचे अपिल
४) अध्यक्ष, गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड यांचे दिनांक १६.०२.२०२२ रोजीचे निवेदन
५) अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांचे पत्र क्र. आस्था.२३/प्र.क्र./का.२ (ब)/ २४१/ २०२३, दिनांक १६.०५.२०२३

**प्रस्तावना-**

आदिवासी विकास विभागांतर्गत अपर आयुक्त, आदिवासी विकास अमरावती व प्रकल्प अधिकारी, किनवट, जि. नांदेड याचे कार्यक्षेत्रात गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड संचलित अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड कार्यरत होती. सदर आश्रमशाळेस नोव्हेंबर १९९८ मध्ये मंजूरी देण्यात आली असून सदर आश्रमशाळेस १ ते १० वर्गांची मान्यता होती. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या दिनांक २२.०४.२०१६ च्या आदेशान्वये अनुदानित आश्रमशाळा, अर्जापूर या आश्रमशाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द करण्यात आली होती.

२. अनुदानित आश्रमशाळा, अर्जापूर या आश्रमशाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द करण्याच्या आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या दिनांक २२.०४.२०१६ रोजीच्या आदेशाच्या विरुध्द संस्थेने तत्कालीन मा. मंत्री आदिवासी विकास यांच्याकडे दिनांक १६.०५.२०१६ रोजीच्या अर्जान्वये अपिल केले होते. तथापि, सदर अपिलावर सुनावणी न झाल्याने संस्थेने मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्रमांक ३०४५/२०२२ दाखल केली. मा. उच्च न्यायालयाने सदर याचिकेमध्ये दिलेल्या न्यायनिर्णयानुसार प्रस्तुत प्रकरणी अपिलावर सुनावणी होणे आवश्यक होते. तसेच अध्यक्ष, गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड यांनी दिनांक १६.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये आदिवासी आश्रमशाळा, अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड या शाळेचे दिनांक १६.०५.२०१६ रोजीचे अपिल मंजूर करण्याची विनंती केली आहे. संस्थेच्या सदर विनंतीच्या अनुषंगाने दिनांक २४.०१.२०२३ रोजी सुनावणी आयोजित करण्यात आली.

३. सुनावणी दरम्यान सहायक आयुक्त, शिक्षण, अमरावती यांनी नमूद केले की, सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षामध्ये प्रकल्प कार्यालय, किनवट यांचेकडून गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड संचलित अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड या आश्रमशाळेच्या केलेल्या अचानक तपासणीमध्ये

आढळुन आलेल्या त्रुटींच्या अनुषंगाने संस्थेस कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली होती. तसेच विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये यासाठी संस्थेस त्रृटींची पूर्तता करण्यास एक संधी देण्याची शिफारस करण्यात आली होती. तद्नंतर प्रकल्प अधिकारी कार्यालयाकडून सदर आश्रमशाळेची दिनांक १७.१२.२०१५ रोजी तपासणी करण्यात आली असता त्रृटींची पूर्तता करणेकामी संधी देऊनही संस्थेने त्रृटींची पूर्तता न केल्याने उक्त आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्याची शिफारस केली होती. प्रकल्प अधिकारी, किनवट यांनी केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी दिनांक २२.०४.२०१६ च्या आदेशान्वये अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर या शाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द केली.

४. सुनावणी दरम्यान संस्थेचे प्रतिनिधी यांनी शाळा सुरु करण्यास मान्यता दिल्यास अनुदानित आश्रमशाळा, अर्जापूर याठिकाणी आहे त्या इमारतीत किंवा बिलोली या तालुक्याच्या ठिकाणी आर.सी.सी इमारतीत अनुदानित आश्रमशाळा सुरु करण्यात येईल. तसेच प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., किनवट यांच्या कार्यालयाच्या अधिकारी /कर्मचारी यांनी दिनांक १७.१२.२०१५ रोजी दिलेल्या भेटीत आढळुन आलेल्या त्रृटींची पूर्तता जून, २०२३ पर्यंत करण्यात येईल व शाळेतील विद्यार्थी कोणत्याही भौतीक सोयी-सुविधांपासून वंचित राहणार नाहीत तसेच सदर शाळा पुर्ववत सुरु झाल्यास शाळेच्या परिसरातील गरीब दुर्बल आदिवासी विद्यार्थी व विद्यार्थिनींना शिक्षणाची संधी उपलब्ध होईल. या आश्रमशाळा संदर्भात नियमानुसार सर्व निकषांची पुर्तता करण्यास तसेच आश्रमशाळेत आवश्यक असणाऱ्या सर्व सेवा सुविधा पुरविण्यास तयार असल्याचे सांगितले.

५. गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड संचलित अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड या आश्रमशाळेस सन १९९८ मध्ये मंजूरी देण्यात आली होती व शाळा बंद करण्यापूर्वी शाळेमध्ये १ ते १० वर्ग सुरु होते. सन २०११-१२ पासून संधी देऊनही संस्थेने त्रृटींची पूर्तता न केल्याने, उक्त आश्रमशाळेची मान्यता आयुक्तालयाकडून कायमस्वरुपी रद्द केली आहे. मात्र आश्रमशाळेमध्ये आढळुन आलेल्या त्रृटींची पूर्तता जून, २०२३ पर्यंत करण्यात येईल व शाळेतील विद्यार्थी कोणत्याही भौतीक सोयी-सुविधांपासून वंचित राहणार नाहीत तसेच आश्रमशाळा संदर्भात नियमानुसार सर्व निकषांची पुर्तता करण्याचे संस्थेने कबुल केले असल्याने अशा परिस्थितीत परिसरातील आदिवासी विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेऊन संस्थेने अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड या आश्रमशाळेच्या सध्याच्या संकुलामध्ये शिक्षणासाठी लागणाऱ्या आवश्यक सर्व सोयी-सुविधांची पूर्तता १ मे, २०२३ पर्यंत करावी. त्यानंतर अपर आयुक्त, अमरावती कार्यालयाने मे, २०२३ मध्ये शाळेची तपासणी करुन आश्रमशाळा सुरु करण्याच्या दृष्टीने सर्व मुलभूत सोयी-सुविधांची पूर्तता झाली असल्याबाबत खात्री करावी व तसा अहवाल मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यात शासनास सादर करावा. संस्थेने आश्रमशाळा सुरु करण्यासाठी सर्व आवश्यक बाबींची पुर्तता केली असल्याची खात्री झाल्यानंतर सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून शाळा सुरु करण्यास मान्यता देण्याबाबतचा निर्णय घेण्यात येईल असे आदेश दिनांक ३१ जानेवारी, २०२३ रोजी पारित केले.

६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांनी दिनांक १२.०५.२०२३ रोजीच्या आदेशान्वये समिती गठीत केली. सदर समितीने गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ बिलोली, ता. बिलोली, जि. नांदेड व्दारा संचलित अनुदानित आश्रमशाळा प्राथमिक व माध्यमिक अर्जापुर ता. बिलोली, जि. नांदेड या शाळेची प्रत्यक्ष पाहणी केली असता शाळेमध्ये दिनांक १५.०५.२०२३ पर्यंत सोयी-सुविधांची पूर्तता झाली नसल्याचे तसेच शाळेच्या कार्यालयामध्ये आर्थिक अभिलेख उपलब्ध नसणे यावरुन आर्थिक अपहार झाल्याचे दिसून येत आहे. विद्यार्थी गुणवत्ता पुर्ण शिक्षण व विद्यार्थी सुरक्षा याचा विचार करता अनुदानित आश्रमशाळा प्राथमिक व माध्यमिक अर्जापुर ता. बिलोली, जि. नांदेड या शाळेस शाळा परत सुरु करण्याची संधी देणे अयोग्य आहे या प्रमाणे अभिप्राय दिले.

समितीने दिलेल्या अभिप्रायावर अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांनी अभिप्राय नमूद करुन दिनांक १६.०५.२०२३ रोजी अहवाल शासनास सादर केला.

**शासन निर्णय-**

अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांनी दिनांक १६.०५.२०२३ रोजी सादर केलेला अहवाल व अभिप्राय विचारात घेता गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड या संस्थेस शाळा परत सुरु करण्यासंदर्भात पुरेशी संधी देण्यात आली आहे. परंतू संस्थेने शाळा इमारत, वसतीगृह इमारत व अन्य सोयी सुविधा उपलब्ध करुन दिलेल्या नाहीत. यावरुन संस्था शाळा सुरु करण्यास उदासिन असल्याचे दिसून येते. तसेच शाळेकरीता मानकानुसार पुरेशी विद्यार्थी संख्या देखिल नाही.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन, गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, जि. नांदेड संचलित अनुदानित आश्रमशाळा अर्जापूर, ता. बिलोली, जि. नांदेड या आश्रमशाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द करण्यात येत आहे. अपर आयुक्त, आदिवासी, विकास, अमरावती यांनी यानुषंगाने आवश्यक कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०२३०६२११६०४१९४१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.06.22 17:36:35 +05'30'

**( उदय ग. गवस )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति-**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती
५. जिल्हाधिकारी, नांदेड.
६. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/ नागपुर.
११. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/ २, मुंबई / नागपुर.
१२. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), किनवट.
१३. विभागीय सह संचालक (शिक्षण), नांदेड.
१४. अध्यक्ष, गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ, बिलोली, ता. बिलोली, जि. नांदेड.
१५. निवड नस्ती (का.११).